**श्रीदत्तचित्साईगुरूभ्यो नमः।**

# श्रीसाईसच्चरित – प्रस्तावना

(१) आपल्या या आर्यावर्तात सद्‌गुरुकृपेवाचून मोक्ष नाही अशी दृढ समजूत, दृढ भावना, दृढ सिद्‌धान्त आहे, व हा सिद्‌धान्त आजकालचा नाही, फार पुरातन आहे. तो वेदकालापासून आहे व त्यास वेदशास्त्रांचा आधार आहे. सद्‌गुरू कोणत्याही जातीचे, धर्मांचे,वयाचे, प्रत्यक्ष अथवा ग्रंथरूप असोत, साधुसंत, देवता, माता, पिता असोत, बंधुभगिनी असोत, मित्रसखा असोत, नवरा असो वा बायको असो, ज्ञात असो वा अज्ञान असोत, ते कसे असावेत, त्यांची सेवा कशी करावी, त्यांची कृपा केव्हा होते, ते उपदेश केव्हा करतात, ज्ञानप्राप्ती केव्हा होते व ज्ञानोत्तर मनोवृत्ती कशी बनते याचे सर्वोत्कृष्ट वर्णन भगवान श्रीसमर्थ सद्‌गुरू ज्ञानेश्वरमहाराज यांनी आपल्या श्रीमद्‌भगवद्‌गीताभाष्यात केले आहे. महाराज लिहितात–

**तें ज्ञान पैं गा बरवें। जरी मनीं अथि आणावें। तरी संतां या भजावें। सर्वस्वेंसीं॥१६५॥**
**जे ज्ञानाचा कुरूठा। तेथ सेवा हा दारवंटा। तो स्वाधीन करी सुभटा। वोळगोनी॥१६६॥**
**तरी तनुमनुजीवें। चरणासीं लागावें। आणि अगर्वता करावें। दास्य सकळ॥१६७॥**
**मग अपेक्षित जें आपुलें। तेंही सांगती पुसिलें। जेणें अंतःकरण बोधलें। संकल्पा न ये॥१६८॥**

– श्रीज्ञानेश्वरी, अ. ४, श्लो.३४

गुरुसेवेचे मार्ग, साधने, अथवा अंगे अनंत आहेत. अद्वितीय राजकारणी पुरुष, राज्यसंस्थापक पराक्रमी वीर, अलौकिक

शास्त्रकार, इतिहासकार, नाटककार, विशाल बुद्धीचे शिक्षक, व्याख्याने, लेखक वगैरे थोर पुरूषांस आपले व्यवहारगुरू मानून त्यांची चरित्रे त्यांची चरित्रे लिहिणे ही गुरूसेवा व जनसेवा आहे. परंतु ही सेवा ऐहिक स्वरूपाची असून ती कालमानानुरूप करावयाची असते. तिचे महत्व व फल शाश्वत नसते; तिला देशकालाची मर्यादा असते. तिच्यात जरी लोकशिक्षण, परोपकार बराच असतो तरी ती स्वार्थमूलकही असते. अतएव ती परमार्थफलदायी नव्हे.

(२) पुष्कळशा साधुसंतांची चरित्रे लिहिणे हाही एक गुरुसेवाप्रकार आहे व तो परमार्थफलदायीही आहे. परंतु हा व उपरिनिर्दिष्ट प्रकार हे दोन्ही एकदेशी किंवा एकांगी होत. यांच्या केवळ लेखनापासून पारमार्थिक अंतिम ध्येय प्राप्त होणे कठीण, किंबहुना नाहीच म्हटले तरी चालेल.

(३) माझ्या अल्प समजुतीप्रमाणे लेखनसेवेत सर्वात उत्तम व खात्रीने मोक्षफल देणारी श्रेष्ठ सेवा म्हणजे गुर्वाज्ञेवरून अथवा आपल्या अंत:स्फूर्तीने आपल्या सद्गुरूचे चरित्र लिहून त्याचे नित्य नियमाने आपण स्वत: अध्ययन व देशकाल-प्रकृत्यनुकूलतेप्रमाणे दृढ निश्चयाने, शुद्ध अंत:करणाने, उत्कृष्ट श्रद्धेने, निस्सीम प्रमाने व अव्यभिचारी भक्तिभावाने शेकडो पारायणे व सप्ताह करणे व इतर सद्भक्तांस करावयास लावणे ही सेवा होय. ही सेवा शरीरवाङ्मनात्मक असून ती कुटुंबपोषणमार्गाच्या अथवा ऐश्वर्याच्या आड येत नाही.

(४) चरित्रलेखनात दोन भेद असतात. संक्षिप्त किंवा विस्तृत आणि गद्य किंवा पद्य. अध्ययन, पठण, पारायण किंवा सप्ताह करण्यास विस्तृत व पद्यचरित्रेच योग्य होत. गद्यचरित्रांची पारायणे किंवा सप्ताह करण्याची पहिवाट नाही. गद्य पाठ करण्यास कठीण. पद्य लवकर व सुलभतेने पाठ होते, स्मरणात राहते व वेळी आठवते. आपले पुरातन संस्कृत वाङ्मय बहुतेक पद्यातच आहे, याचे कारण तरी हेच असले पाहिजे. पद्य व विस्तृत गुरुचरित्राचे अध्ययन, पठण, पारायण व सप्ताह यांनी

गुरूसेवा उत्तम होते, असा सार्वत्रिक अनुभव असून आपल्यात प्रघातही तसाच आहे.

(५) पारायणे व सप्ताह करण्याची चाल फार प्राचीन आहे. वेदकालापासूनची आहे. वेदांची, भागवताची, रामायणाची, योगवसिष्ठाची वगैरे गीर्वाण ग्रंथराजांची पारायणे व सप्ताह नित्य कोठे ना कोठे होत असतात, हे आपण पाहतो व ऐकतो.

(६) त्याचप्रमाणे श्रीज्ञानेश्वरी, श्रीनाथभागवत, श्रीदासबोध वगैरे मराठीत लिहिलेल्या विश्ववंद्य ग्रंथराजांचीही पारायणे व सप्ताह नित्य होत असतात. ही चालही पुरातनच आहे. ही चरित्र ग्रंथ नसून केवळ ऐहिक व पारमार्थिक ज्ञानग्रंथ आहेत. तथापि, जे पुरूष या ग्रंथनिर्मात्यांस अथवा या ग्रंथांसच आपले गुरू मानतात त्यांना या ग्रंथांचे अध्ययन, पठण, पारायण व सप्ताह केल्याने निःसंशय सर्वोत्कृष्ट, अनुपमेय व मोक्षफलदायी गुरूसेवा घडते.

(७) गुरुचरित्र म्हणजे गुरुंचा अवतार, बालपण, करूणपण, वृद्धपण, त्यांनी केलेल्या अद्‌भुत लीला, दाखविलेले अतुल चमत्कार, केलेली अवतार-कार्ये वगैरे गोष्टींचा लिहिलेला विश्वसनीय व सत्य ग्रंथ.

(८) वरील केवळ ज्ञानग्रंथांचा व गुरुचरित्रग्रंथांचा उपयोग मात्र दोन्ही प्रकारांनी करण्यात येतो. काम्य दृष्टीने व निष्कामबुद्धीने. काम्य - ऐहिक, ऐश्वर्योपभोगासाठी किंवा चिंता, आपत्ती, संकट, रोगयातना, पीडानिवारण होण्यासाठी आणि निष्काम - संसारनिवृत्ती किंवा जन्ममरणमुक्ततेसाठी. निष्काम गुरूसेवा ही केव्हाही श्रेष्ठच ठरणार. मग ती गुरूचरित्र-लेखन-सेवा असो वा अन्य प्रकारची असो.

(९) गुरुचरित्र-लेखन-सेवा ही नारदपुराणात दिली आहे; यावरून ती फार प्राचीन आहे यात शंका नाही.

(१०) आपल्या या भारतभूमीला अवतीर्ण झालेल्या साधुसंतांची चरित्रे आपल्याकडील प्रसिद्ध श्रीमन्महिपती कविमहाराजांनी मराठीत ओवीप्रबंधात आपल्या प्रख्यात जगन्मान्य श्रीभक्तलीलामृत व श्रीसंतलीलामृत या दोन ग्रंथांत लिहून

ठेवली आहे.

(११) तसेच, त्यानंतरच्या बहुतेक सर्व महाराष्ट्रीय अर्वाचीत साधुसंतांची संक्षिप्त चरित्रे आपल्याकडील प्रसिद्ध श्रीदासगणू कविमहाराजांची आपल्या विख्यात श्रीभक्तलीलामृत व श्रीभक्तिसारामृत या तीन मराठी ग्रंथांत ओवीप्रबंधात लिहून ठेवली आहेत.

(१२) या उपरिनिर्दिष्ट कविवर्यद्वयांनी लिहून ठेवलेल्या प्रत्येक ग्रंथाचे पारायण किंवा सप्ताह करता येईल; परंतु त्यांतील कोणत्याही एका साधुसंताच्या चरित्राचे स्वतंत्र रीतीने पारायण किंवा सप्ताह करू म्हटले ती, ते चरित्र सर्वांगपूर्ण व विस्तृत नसल्यामुळे व त्या चरित्रास वरील ग्रंथात फार तर दोन-तीन पानेच खर्ची घातली असल्याकारणाने ते चरित्र पारायण किंवा सप्ताह करण्यास मुळीच उपयोगी पडत नाही.

(१३) विस्तृत पद्यमय गुरुचरित्राच्या अध्ययनाने, पठणाने, पारायणाने किंवा सप्ताहाने चरित्रलेखकास तर गुरुसेवा होतेच; त्याचबरोबर इतर भक्तांनाही जर त्या चरित्राचे अध्ययन, पठण, पारायण व सप्ताह केले तर लेखकास जनीजनार्दनाची सेवा घडून, लोकसंग्रहाच्या सेवेचे श्रेय मिळून त्या इतर भक्तजनांच्या जन्माचेही सार्थक होते.

(१४) सद्गुरू ग्रंथरूपाने आपल्या भक्तांकडून दोन प्रकारची सेवा घेतात. एक, श्रीज्ञानेश्वरी, श्रीनाथभागवत, श्रीदासबोध यांसारखे महान ग्रंथ आपण स्वत:च निर्माण करून किंवा दुसरी आपली चरित्रे आपल्या सद्भक्ताकडून लिहवून घेऊन त्यांचे लेखकाकडून व भक्तवृंदाकडून अध्ययन, पठण, पारायणे व सप्ताहरूपाने सेवा घेणे.

(१५) अनेक सद्भक्तांनी आपापल्या इच्छेनुसार व आवडीनुसार आजपर्यंत निरनिराळ्या भाषांत आपापल्या गुरूंची गद्याप्रमाणे पद्यचरित्रे लिहून जगास ऋणी करून ठेवले आहे. तथापि, पारायणे व सप्ताह करण्यास योग्य, विस्तृत, पद्य, व्यापक,

सर्वांगपरिपूर्ण, प्रख्यात असे निदान आपल्या महाराष्ट्रात तरी पाहिले, फार जुने. गोड, रसाळ, चटकदार, प्रासादिक, श्रीसरस्वतीगंगाधर यांनी क्षेत्र औदुंबर, श्रीवाडी, श्रीगाणगापूरनिवासी, श्रीसमर्थ सद्गुरू नृसिंहसरस्वती महाराज यांचे लिहिलेले चरित्र, जे बृहत किंवा थोरले गुरुचरित्र म्हणून हल्ली प्रसिद्ध आहे, जे आबालवृद्धांच्या उत्तम परिचयाचे आहे, ज्याचे नित्यश: हजारो ठिकाणी नियमाने रोज अध्ययन-पठण होते व प्रसंगानुसार ज्याची पारायणे व सप्ताह होतात. दुसरे अगदी अलीकडील मधुर, रसपूर्ण, उद्बोधक, प्रसादजन्य कै. भक्तवर्य श्री. गोविंद रघुनाथ ऊर्फ अण्णासाहेब दाभोलकर यांनी श्रीक्षेत्र शैलधी (शिर्डी), तालुका कोपरगाव (सध्या ता. राहता), जिल्हा अहमदनगर येथील निवासी, क्षेत्रसंन्यासी, आधुनिक संतचूडामणी श्रीसच्चिदानंद समर्थ सद्गुरू साईबाबामहाराज यांचे लिहिलेले चरित्र, जे ‘श्रीसाईसच्चरित’ या नावाने ‘श्रीसाईलीलेला’ ६ वर्षे प्रत्येक अंकात एक एक अध्याय या रूपाने प्रसिद्ध होऊन, नुकतेच या वर्षाच्या (सातव्या वर्षाच्या) ५-६-७-८ या जोड अंकात अवतरणिकाध्यायासह पूर्ण झाले आहे व ज्याबद्दल ही हल्लीची प्रस्तावना लिहिली आहे. अशा या दोन गुरुचरित्रांखेरीज कोणी तिसरे इतके विस्तृत लिहिलेले गुरुचरित्र आढळत नाही.

(१६) श्रीसमर्थ सद्गुरू टेंभेस्वामी ऊर्फ वासुदेवानंदसरस्वतीमहाराज यांनी एक विस्तृत, विद्वत्तापूर्ण, विविध वृत्त, शब्दालंकार, अर्थालंकार, शब्दार्थालंकार, कुट्टकसुभाषितयुक्त असे लिहिलेले छापील गुरुचरित्र बऱ्याच वर्षापूर्वी माझ्या पाहण्यात आल्याचे स्मरते.

(१७) तसेच, श्रीसमर्थसद्गुरु श्रीक्षेत्र बाळेकुंद्री येथील निवासी दत्तमहाराज यांनीही एक गुरुचरित्र लिहिले आहे, असे ऐकतो; परंतु हे गुरुचरित्र अद्यापि छापून प्रसिद्ध झालेले दिसत नाही.

(१८) श्रीसमर्थसद्गुरु वासुदेवानंदसरस्वतीमहाराजांनी लिहिलेले गुरुचरित्र श्रीसरस्वतीगंगाधरांनी लिहिलेल्या

गुरुचरित्राइतके अद्यापि प्रसिद्धीस आलेले दिसत नाही. कदाचित महाराजांच्या भक्तमंडळाकडून त्यांचे अध्ययन, पठण, पारायण व सप्ताहही श्रीपुण्यमहासरित नर्मदातीरावर गायकवाडीत चांदोद-कर्नाळीपासून बऱ्याच अंतरावर असलेल्या श्रीगरुडेश्वरक्षेत्री महाराजांच्या समाधिमंदिरात होतही असतील; परंतु त्याची नक्की माहिती मिळालेली नाही. हे चरित्र महाराजांनी स्वत:च लिहिले असल्याकारणाने त्याची गणना श्रीसरस्वतीगंगाधर व कै. श्री. अण्णासाहेब दाभोलकर यांनी लिहिलेल्या गुरुचरित्र-लेखनात करता येणार नाही.

(१९) खुद्द श्रीसमर्थसद्गुरू साईबाबा महाराज यांच्या कृपेस पात्र झालेले व आधुनिक कविश्रेष्ठांत ज्यांची प्रामुख्याने गणना होत आहे व ज्यांनी आजपावेतो मनाचे श्लोक, जलददूत काव्य, नाटकखंड, लावण्या, पोवाडे, ग्राम्यगीत, अर्वाचीन भक्तलीलामृत, संतलीलामृत, भक्तिसारामृत, ईशावास्यभावार्थमंजिरी, अमृतानुभवटीका, गोदामाहात्म्य, स्तोत्रे, अष्टके, सुभाषिते, कीर्तनोपयोगी आख्याने, चक्रीभजन, स्फुट कविता वगैरे लहानमोठे पुष्कळ ग्रंथ लिहिले आहेत व सर्वांच्या परिचयाचे असे श्रीदासगणूमहाराज यांनी श्रीबाबांची दोन चरित्रे एक त्यांनी आपल्या भक्तलीलामृतात व दुसरे भक्तिसारामृतात अनुक्रमे ३१,३२,३३,व ५२,५३ या अध्यायांत, लिहिली आहेत. पहिल्याची पृष्ठसंख्या १२ असून ओवीसंख्या ५०९ आहे व दुसऱ्याची पृष्ठसंख्या १२ असून ओवीसंख्या ४९७ आहे.

(२०) ही दोन्ही चरित्रे सर्वोत्कृष्ठ, हृदयंगम, रसाळ, प्रसादजन्य आहेत यात शंका नाही. ती अध्ययन, पठण, पारायण व सप्ताह करण्यास योग्य आहेत; फक्त ती फारच लघु आहेत इतकेच, त्यांतील कथा व श्रीसाईसच्चरितातील कथा कमी-जास्त प्रमाणाने बहुतेक एकच आहेत. आपल्या देशाची हीन स्थिती व तिची कारणे यांचे हृदयस्पर्शी सुंदर चित्र श्रीदासगणूमहाराजांनी इतर ग्रंथाप्रमाणे या लघुचरित्रातही उत्तम रेखाटले आहे. श्री. अण्णासाहेब या भानगडीत मुळीच पडले नाहीत.

(२१) श्रीक्षेत्र वाडी येथील श्रीदत्तस्तवराज या छोटेखानी पुस्तकातील माहितीवरून श्रीसरस्वतीगंगाधर यांनी लिहिलेल्या बृहद्गुचरित्राहून एक निराळा स्वतंत्र फक्त ७०७ श्लोकी लघुगुरुचरित्र नावाचा ग्रंथ वाडीत आहे. तो थोरल्या गुरुचरित्रापेक्षा फार प्राचीन आहे असे दिसते. पण हे चरित्र कोणी व कधी लिहिले हे समजण्यास मार्ग नाही. यातील चरित्रनायक तेच थोरल्या गुरुचरित्रातील चरित्रनायक होत. या चरित्रनायक श्रीसमर्थ सद्गुरू नृसिंहसरस्वतीमहाराजांचा समाधिकाल शके ११४० हा आहे, असे लघुगुरूचरित्रातील ७०५, ७०६, ७०७ या ओव्यांवरून दिसते.

(२२) श्रीसरस्वतीगंगाधर यांचे उपनाव साखरे. या साखरे कुळातील श्रीसायंदेव हे श्रीसमर्थ सद्गुरू नृसिंहसरस्वतीमहाराजांच्या कृपेस पात्र झाले. त्यांच्यावर नंतर सद्गुरुंचा अनुग्रह होऊन ''तुझ्या वंशजांकडून माझी निरंतर सेवा होत जाईल,'' असे त्यांना वरप्रदान मिळाले. श्रीसायंदेवापासून पाचवे पुरुष हे श्रीसरस्वतीगंगाधर होत. या श्रीसरस्वतीगंगाधरांना हल्ली प्रसिद्ध असलेले बृहद्गुरुचरित्र लिहिण्यास स्वत: श्रीसमर्थ सद्गुरू नृसिंहसरस्वतीमहाराजांनी आज्ञा केली, असे त्याच चरित्रात लिहिलेले आहे. यावरून हे चरित्रसुद्धा पुष्कळ वर्षांचे जुने आहे असे दिसते. चरित्रलेखनाचा किंवा चरित्रलेखकाचा काल दिलेला नाही.

(२३) याच श्रीसमर्थ सद्गुरूनृसिंहसरस्वतीमहाराजांचा अवतार पुन्हा श्रीक्षेत्र आळंदी येथे होऊन ते शके १८०७ साली समाधिस्थ झाले असे श्रीदासगणूमहाराजांनी आपल्या श्रीभक्तलीलामृत या ग्रंथाच्या ३० व्या अध्यायात १२ व १०३ ओवीत लिहिले आहे. यावरून हल्ली प्रचारात असलेले थोरले गुरुचरित्र शके १८०७ सालानंतर लिहिले नसून, जरी लघुगुरुचरित्राइतके जुने नसले तरी, खात्रीने शके १८०७ सालाच्या पुष्कळच पूर्वी लिहिले गेले असले पाहिजे यात शंका नाही.

(२४) असो. आपल्याला गुरुसेवा घडावी, आपल्या हातून शक्य तितका लोकसंग्रहही व्हावा व मातृभाष्यावाङ्मयाची

सेवा व्हावी, या उदात्त हेतूने श्रीसमर्थ सद्गुरू साईबाबामहाराज यांच्या आज्ञेवरून श्री. अण्णासाहेबांनी सेवावृत्तिशृंखलाविमोचन झाल्यावर हे गुरुचरित्र लिहिले आहे.

(२५) श्रीसरस्वतीगंगाधरांच्या गुरुचरित्राप्रमाणेच या श्रीसाईसच्चरितात अवतरणिकाध्यायासह ५३ अध्याय आहेत. पहिल्याची ओवीसंख्या ७३०० आहे, याची ओवीसंख्या ९४५० आहे.

(२६) संस्कृतात जसा अनुष्टुप छंद तसाच मराठीत ओवीप्रबंध हा मोठ्या कवित्वलेखनास योग्य आहे. चरित्रग्रंथांस ओवीप्रबंध सुगम असतो म्हणूनच मराठीतील बहुतेक मोठमोठे नामांकित विश्ववंद्य पद्यग्रंथ ओवीप्रबंधातच लिहिलेले आढळतात. याच कारणाकरिता श्रीसाईसच्चरितही ओवीप्रबंधातच लिहिलेले आहे.

(२७) श्रीसरस्वतीगंगाधरांच्या गुरुचरित्रातील कथा सर्वथैव विश्वसनीय व अनुभवजन्य अशाच आहेत; परंतु त्या श्रीसरस्वतीगंगाधरांच्या प्रत्यक्ष अनुभवाच्या आहेत किंवा त्यांची माहिती त्यांना मुखपरंपरेने मिळाली आहे, किंवा ज्यांच्या कथा लिहिल्या आहेत त्या व्यक्तींनी त्यांना समक्ष किंवा लेखाद्वारे कळविली आहे, हे समजण्यास आज आपल्याजवळ काहीच साधन नाही व त्या ग्रंथातही त्यासंबंधाचा काही खुलासा केलेला नाही.

(२८) श्रीसाईसच्चरितात ज्या कथा अगर लीला वर्णिलेल्या आहेत त्यापैकी पुष्कळ श्री. अण्णासाहेबांनी स्वत: डोळ्यांनी पाहिल्या आहेत व बाकीच्या ज्या भक्तांस श्रीबाबांचे प्रत्यक्ष स्वप्नात अनुभव आले व ज्यांनी ते अनुभव त्यांच्या समजुतीप्रमाणे जसेच्या तसेच अण्णासाहेबांस लिहून कळविले अगर तोंडी निवेदन केले व त्यापैकी बहुतेक अजूनही हयात आहेत, त्या लीला व अनुभवांवर अण्णासाहेबांनी फक्त आपल्या प्रासादिक व रसाळ वाणीने कथास्वरूपाचा पद्यमय, मोहक व सुंदर पेहराव चढवून त्यांचे हृदयंगम वर्णन श्रीसाईसच्चरितात केले आहे.

(२९) प्रत्येक अध्यायात प्रथम वेदान्त, नंतर गुरुगौरव व नंतर कथा याप्रमाणे ५१ अध्यायांची मांडणी केली आहे. ५२ व्या अध्यायात सिहांवलोकन करून, अवतरणिका देऊन ग्रंथ संपूर्ण करू, असे पहिल्यात एका ओवीत लिहिले आहे; परंतु हल्ली जो ५२ वा अध्याय प्रसिद्ध झाला आहे त्यात सिंहावलोकनही दिसत नाही व अवतरणिकाही दिसत नाही. त्यात श्रीसद्गुरुमहात्म्य, श्रीसाईसच्चरित-फलश्रुती, ग्रंथकाराची प्रसादयाचना व प्रार्थना इतक्याच गोष्टी आहेत. ५१ वा अध्याय प्रसिद्ध झाला. आता फक्त ५२ वा अध्याय प्रसिद्ध होणे राहिलेला या अंकी प्रसिद्ध होऊन श्री साईसच्चरित ग्रंथ आता संपूर्ण झाला आहे,' असे खुद्द अण्णासाहेबांच्या हातचे शब्द 'श्रीसाईलीलाच्या सहाव्या वर्षाच्या तिसऱ्या अंकात ८८० पानावर छापलेले आहेत. यावरून अवतरणिकेच्या व सिहांवलोकनाच्या ओव्या लिहिलेली चिठोरी कोठेतरी गहाळ झाली असावी असे दिसते. नेहमीच्या सवयीप्रमाणे अण्णासाहेबांनी ५२ वा अध्यायाही चिठोऱ्यांवरच लिहिला होता. ती चिठोरी मजकडे तपासण्याकरिता आली होती. त्यात ओव्यांचे क्रमांक नव्हते व चिठोऱ्यांचे अंक २० पासून पुढे होते. यावरून सिहांवलोकनाच्या व अवतरणिकेच्या ओव्या गहाळ झाल्या असाव्यात किंवा विस्मृतीने तयार करावयाच्या राहिल्या असाव्यात असे वाटते. हल्ली अवतरणिकेचा नवा अध्याय तयार करून तो ५३ वा अध्याय म्हणून ग्रंथास जोडला आहे. याप्रमाणे एकंदर या श्री साईसच्चरिताची किंवा गुरुचरित्राची रचना आहे.

(३०) श्रीबाबांचे शिर्डी क्षेत्री प्रथमागमन, तिरोभवन, पुनश्च प्रकटीकरण, त्यांच्या अद्भुत लीला, अप्रतिम चमत्कार, भक्तानुभव, अनुग्रह, उपदेश-ग्रंथवाचन, ग्रंथलेखन, पादुकापूजन, इष्टदेवतापूजन, ईश्वरभजन, जप, तप, नामस्मरण, आसन, उपासना, धनसुतदारा-दान, संकटनिवारण, व्याधिनाश, योगैश्वर्य, मशीदमाई-प्रभाव, धुनीमाई-प्रताप, घरट्टपेषणपराक्रम, नित्यक्रम, आहारविहार, शयन, चिलीम, पादत्राण, पेहराव, संताविष्करण, शंकादिरसन, पंचमहायज्ञसामर्थ्य, धर्मशिक्षण,

व्यवहारशिक्षण, परमार्थपाठ, सर्वव्यापकत्व, सर्वज्ञता, मनोगतकथन, पूर्वकथन, पूर्वजन्मकथन, भविष्यकथन, हंडी किंवा डेग, चावडी, भिक्षा, भिक्षाधिकार, मंदिर, लेंडीबाग, उत्सव, पंचतत्त्वप्रभुत्व, परस्पर मनोमय चिच्छक्तिसंदेश, औदार्य, भक्ती, ज्ञान, वैराग्य, दया, क्षमा, शांती, निर्याण वगैरे विषयांच्या सुमारे १५० ते १७५ पर्यंत कथा, उपकथा व आडकथा या श्रीसाईसच्चरितात वर्णिलेल्या आहे.

(३१) कित्येक ठिकाणी एकेक अध्यायात २, ३, ४, ५, पर्यंतही कथा आल्या आहेत, तर कित्येक ठिकाणी २ किंवा ३ अध्याय मिळून एकच कथा वर्णिली आहे.

(३२) कविता-ग्रंथ तीन प्रकारचे असतात: नेसर्गिक, प्रासादिक व कृत्रिम कविता केवळ विद्वत्तेच्या व बुद्धिमत्तेच्या जोरावर केलेली असते; ती उत्तम ठरेल; परंतु शाश्वत टिकणार नाही व तिच्यात प्रतिभा, प्रसाद किंवा देणगी हे गुण कधीही येणार नाहीत. गुरुकृपेवाचून अंगी कितीही विद्वत्ता असली तरी हल्लीच्या ग्रंथासारखा ग्रंथ निर्माण होणे कठीण. कोणत्याही पारमार्थिक ग्रंथात वरील तीन गुण असल्याखेरीज मुमुक्षू वाचकांवर त्याची छाप पडणार नाही व त्यांची त्यावर श्रद्धा व विश्वास बसणार नाही. श्रीसाईसच्चरित हा ग्रंथ प्रसादजन्य आहे व त्यामुळेच तो कोणाही मुमुक्षू भक्तास आवडणारा असून त्याचे नित्यश: अध्ययन, पठण होऊन त्याची शेकडो पारायणे व सप्ताह झाल्यावाचून राहणार नाहीत.

(३३) अण्णासाहेबांच्या घराण्यात मूळपासून गुरुभक्ती होती किंवा नव्हती हे समजण्यास हल्ली मार्ग नाही; परंतु अण्णासाहेबांनी आपल्या स्वत:संबंधाने तिसऱ्या अध्यायात जी हकीकत लिहिली आहे तीवरून पाहता अण्णासाहेबास प्रथमत: गुरूभक्ती किंवा गुरुप्रेम मुळीच नव्हते. तसेच, गुरूकरणे हे थोतांड आहे. असे त्यांस वाटत असून गुरू करण्याची आवश्यकताच नाही, असे ते प्रतिपादन करीत व स्वकर्तृत्वाचाच अभिमान अधिक बाळगीत असत. परंतु श्रीबाबांची नजरानजर होऊन काही

मनोमय साक्षित्व शब्दोच्चार झाल्याबरोबर ते सर्वस्वी अभिमानगलित झाले व सद्गुरूवाचून तरणोपाय नाही अशी त्यांना पूर्ण खात्री पटली. नंतर त्यांच्यावर बाबांची कृपाही झाली. श्रीसाईसच्चरितलेखन हे त्याच कृपेचे फल होय. अण्णासाहेबांनी विश्ववंद्य अशा पुष्कळ साधुसंतांचे जगन्मान्य काव्यग्रंथ वाचले असल्याकारणाने त्यांच्या श्रीसाईसच्चरितावर प्रामुख्येकरून श्रीसमर्थ सद्गुरू नाथमहाराजांच्या श्रीएकनाथी भागवत भाषाथाटाची छाप पडलेली दिसते.

(३४) श्रीसाईसच्चरितलेखनाबद्दल आधुनिक विद्वन्मणी श्री. चिंतामणराव विनायक ऊर्फ नानासाहेब वैद्य यांनी आपला अनुकूल अभिप्राय प्रकट करून अण्णासाहेबांना 'महिपती' ही पदवी देऊन त्यांचा व त्यांच्या ग्रंथाचा गौरव केला आहे. (श्रीसाईलीला वर्ष २, अंक ९, पान १८२) यावरून हे श्रीसाईसच्चरित नुसते गुरुचरित्र नसून ते एक उत्कृष्ट रसात्मक काव्य आहे.

(३५) श्रीसाईसच्चरितात भगवान श्रीज्ञानेश्वरमहाराज लिहितात त्याप्रमाणे अण्णासाहेबांच्या वाणीचे व लेखनाचे सार्थक झाले आहे. **''वाचे बरवें कवित्व। कवित्वीं बरवें रसिकत्व। रसिकत्वी परतत्त्व। – स्पर्शु जैसा'' ।।३४७।।** (श्रीज्ञानेश्वरी अ. १८, श्लो. १४). ग्रंथात दृष्टान्त,उपमा, अलंकार, रसपरिपोष यांचा भरपूर भरणा आहे.

(३६) श्रीसरस्वतीगंगाधरांनी लिहिलेल्या गुरुचरित्राप्रमाणे याही श्रीसाईसच्चरिताचे नित्य अध्ययन व पठण होऊन त्याची शेकडो पारायणे व सप्ताह व्हावेत अशी ग्रंथकर्त्याची फार फार इच्छा होती. ती इच्छा फलद्रूप झाल्याचा सोहळा पाहण्यास ते जिवंत राहिले नाहीत हा दैवदुर्विपाक आहे.

(३७) हा ग्रंथ मुमुक्षू भक्तांस एक प्रकारचा गोड, मधुर,परमार्थ–मेवाच आहे. अण्णासाहेबांच्या सदिच्छेस मान देऊन मुमुक्षू भक्तांनी स्वत: आपण या मेव्याचे श्रद्धेने व अंत:करणपूर्वक आकंठ सेवन करून इतर भक्तांसही करावयास लावल्यास

भगवान श्रीज्ञानेश्वरमहाराज लिहितात त्याप्रमाणे मुमुक्षू भक्तांना ज्ञानयज्ञाने श्रीसाईपरमात्मा संतुष्ट केला असे होऊन ते शरीरनाशानंतर त्याच षड्गुणैश्वर्य श्रीसाईपरमात्म्याशी एकरूप होतील यात तिळप्राय शंका नाही.

**पैं माझिया तुझिया मिळणीं । वाढीवली जे हे कहाणी । मोक्षधर्म का जिणी । आलासे जेथें ।।**
**तो हा सकलार्थप्रद । आम्हां दोघांचा संवाद । न करितां पद भेद । पाठेंचि जो पढे ।।**
**तेणें ज्ञानानळीं प्रदीप्तीं । मूळ अविद्येचिया आहुतीं । तोषविला होय सुमति । परमात्मा मी ।।**
**ते हे मंत्ररहस्य गीता । मेळवी जो माझिया भक्तां । अनन्यजीवन माता । बाळका जैसी ।।**
**तैसी भक्तां गीतेसी । भेटी करी जो आदरेंसी । तो देहापाठीं मजसी । येकचि होय ।।**

श्री ज्ञानेश्वरी, अ.१८, श्लोक ७० व ६८, ओव्या १५२४, १५२५,
१५२६, १५१२ व १५१३, कै. कुंटे प्रत पाने ५३०-५३१.

शेवटी कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम् शक्तिमान, सर्वज्ञ, सर्वसाक्षी, श्रीसमर्थसद्गुरुसाईपरमात्म्याचे पुण्यचरणकमली अनन्यभावे नम्रतापूर्वक मस्तक ठेवून ही बरीच लांबलेली प्रस्तावना संपवितो.

**ठाणे:** **बाबांचे बाळ**
**ता. २०-११-१९३०** **(कै. बाळकृष्ण विश्वनाथ देव)**

# श्रीसाईसच्चरित

# ।। श्रीसाईसच्चरित ।।

**श्रीगणेशाय नमः ।। श्रीसरस्वत्यै नमः ।। श्रीसद्‌गुरुभ्यो नमः ।।**

**गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुर्गुरुर्देवो महेश्वरः। गुरुः साक्षात् परब्रह्म तस्मै श्रीगुरवे नमः ।।१ ।।**

**ब्रह्मानंदं परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिं। द्वंद्वातीतं गगनसदृशं तत्त्वमत्स्यादिलक्ष्यम् ।।**

**एकं नित्यं विमलमचलं सर्वधीसाक्षिभूतं। भावातीतं त्रिगुणरहितं सद्‌गुरुं तं नमामि ।।२ ।।**

# उपोद्घात

श्री साईनाथ महाराज सुमारे पन्नास वर्षांपूर्वी शिर्डीस प्रथम आले. शिर्डी हे गाव अहमदनगर जिल्ह्यात राहाता (पूर्वीचे कोपरगाव) तालुक्यात आहे. महाराज मूळ कोठील राहणारे व त्यांची मातापितरे कोण, याविषयी खात्रीलायक माहिती मिळत नाही. एवढे मात्र खचित दिसते की, महाराजांचा मोंगलाईशी संबंध बराच असावा. महाराजांच्या बोलण्यात शेलू, जालना, माणवद, पाथरी, परभणी, नौरंगाबाद (म्ह. औरंगाबाद), बीड, बेदर या मोंगलाईच्या गावांचा वारंवार उल्लेख येत असे. एकदा एक पाथरीचा गृहस्थ महाराजांच्या दर्शनास आला होता. त्याला महाराजांनी पाथरीची हकीकत विचारून तेथील बहुतेक ठळक ठळक गृहस्थांची नावे घेऊन त्यांच्याविषयी चौकशी केली. यावरून महाराजांना पाथरीची विशेष माहिती होती असे मानता येईल; पण त्यांचा जन्म तेथलाच असावा असे खात्रीलायक म्हणता येत नाही.

तसेच, महाराज मूळचे ब्राह्मण होते, की ते जन्मतःच मुसलमान होते, हे निश्चयात्मक सांगता येत नाही. किंबहुना त्यांच्या

कित्येक भक्तांच्या मानण्याप्रमाणे ते 'अयोनिज' होते की काय, हेही सांगता येत नाही. महाराजांना अयोनिज मानणे हे भक्तेतरांच्या दृष्टीला अशक्य वाटेल, पण हे प्रस्तुत लेखकाला वाटत नाही. या लेखकाजवळ महाराजांनी स्वतः एकदा असे उद्‌गार काढले होते, की 'आता आपण जाऊ ते आठ वर्षांचे होऊन येऊ'. श्रीकृष्णमूर्ती देवकीमातेजवळ प्रकटली तेव्हा आठ वर्षांचीच होती, असे पुराणांतरी वर्णन आहे. 'आठा वर्षांची मूर्ति। असंभाव्य पडिली दीप्ति। तेजें दशदिशा उजळती। तेथें लपती शशिसूर्य।। (हरिविजय अ. ३, ओ. १२६). महाराजांचे पुष्कळ भक्त, त्यांना हे साधकाचे सिद्ध झालेले मानीत नसून प्रत्यक्ष अवतार मानतात व महाराजांच्या लीला व त्यांची अद्‌भुत शक्ती पाहून त्यांना श्रीकृष्णाचा अवतार मानणारे पुष्कळ आहेत. महाराज मात्र स्वतः आपल्याकडे तो अधिकार घेत नसत. ते बोलताना आपल्याला परमेश्वराचा सेवक 'बंदा' म्हणवून घेत. आपल्या गुरूचा आशीर्वाद देताना प्रायः 'अल्ला भला करेगा' हेच शब्द असत. स्वतःकडे कधीही मोठेपणा घेत नसत. ते कधीही 'अनल हक्क' म्हणजे 'मीच परमेश्वर' असे म्हणत नसत. पण त्यांचा उच्चार वारंवार 'यादे हक्क' म्हणजे 'मी परमेश्वराची याद म्हणजे स्मरण करतो' हा असे.

महाराज शिर्डीस आले ते एका मुसलमान गृहस्थाकडील वरातीबरोबर आले. त्याचे नाव चांदभाई, तो धूपखेडे नावाच्या गावचा पाटील होता. एक दिवस त्याचा घोडा चुकला म्हणून त्याला शोधावयाला तो रानात चालला होता. तो तेथे एका झाडाखाली त्याला महाराज बसलेले दिसले. महाराजांना त्याने पूर्वी कधी पाहिले नव्हते. महाराजांनी त्याला हाक मारली व चिलीम पिऊन जा, असे म्हटले. तो म्हणाला, ''माझा घोडा चुकला आहे व मी त्याच्या शोधासाठी निघालो आहे.'' महाराज म्हणाले, ''त्यासाठी लांब कशाला जावयाला पाहिजे ? तो पलीकडच्या कुंपणाच्या आड आहे.'' त्याबरोबर चांदभाई,

महाराजांनी सांगितलेल्या कुंपणाकडे गेला. तो तेथे घोडा खरोखरच चरत होता. चांदभाईने घोडा घेतला व तो महाराजांकडे आला. महाराजांनी त्याला चिलीम पाजल्यावर तो महाराजांना आपल्या घरी येण्याबद्दल आग्रह करू लागला. महाराज म्हणाले, 'मी उद्या येईन.' त्याप्रमाणे महाराज दुसरे दिवशी त्याच्या घरी गेले. चांदभाईला चिलीम पाजली तेथे रानात विस्तव नव्हता. महाराजांनी आपल्या हातात असलेला चिमटा जमिनीवर आपटून विस्तव उत्पन्न केला व आपले काम करून घेतलें.

महाराज चांदभाईच्या घरी काही दिवस राहिले. नंतर चांदभाईच्या बायकोच्या भाच्याची सोयरीक शिर्डीच्या एका मुलीशी झाली व त्या लग्नाचे वरातीबरोबर महाराज शिर्डीस आले. वरात गावाबाहेर खंडोबाचे देवळाजवळ एका मळ्यात उतरली. महाराज खंडोबाच्या देवळात गेले तो तेथे त्यांना **म्हाळसापती** या नावाचे गृहस्थ भेटले. हे म्हाळसापती शिर्डीचे राहणारे असून जातीने दैवज्ञ होते. हे खंडोबाचे भक्त असून खंडेरायाची वारी त्यांच्याकडे कित्येक पिढ्यांपासून असे. महाराज खंडोबाचे देवळात गेले तेव्हा कफनी, टोपी व अंगावर धोतर असा पोषाख होता. त्यांना पाहिल्याबरोबर म्हाळसापतींनी 'आवो सांईबाबा' या शब्दांनी त्यांचे स्वागत केले, व तेच नाव म्हणजे **'साईबाबा'** महाराजांनी अखेरपर्यन्त धारण केले. महाराजांची बहुतेक भक्तमंडळी त्यांना **साईबाबा** किंवा **बाबा** असे म्हणत. महाराजांची एकदा एका कामात कमिशनवर साक्ष झाली, तेव्हा महाराजांना नाव विचारले असतां 'मला साईबाबा म्हणतात', असे उत्तर दिलें. म्हाळसापती महाराजांना गावात घेऊन आले व तेथे त्यांनी महाराजांची व आपले सोबती **काशीराम शिंपी** व **आप्पा जागले** यांची गाठ घालून दिली. हे तिघेही गावात येणाऱ्या साधुसंतांची, गोसावी-बैराग्यांची, फकीर-फुकऱ्यांची आपल्या शक्तीप्रमाणे सेवा करीत व त्यांचा परामर्ष घेत. शिर्डी गाव फार रहदारीचे असल्यामुळे येथे वारंवार अशी मंडळी येत व त्यांची थोडीबहुत संभावना, वर लिहिलेल्या तिघांकडून होत असे. हे

तिघेही (काशीराम, आप्पा व म्हाळसापती) महाराजांचे पूर्ण भक्त बनले. यांपैकी काशीराम व आप्पा हे पुढे काही वर्षांनी वारले. काशीरामांनी आधी देह ठेवला व त्यानंतर काही वर्षांनी आप्पांनी देह ठेवला. पण दोघांनाही मरणसमयी एकादशी लाभली. हरिभक्तांचे मरण हरिदिनीच होणे व त्याप्रमाणेच या दोघांचेही झाले. काशीरामांनी महाराजांची सेवा अतिउत्तम तऱ्हेने म्हणजे खरोखरच तनमनधनाने केली. महाराजांची कफनी पूर्वी भगवी किंवा पांढरी असे. काशीरामाने हिरवी कफनी व हिरवी टोपी महाराजांना शिवून दिली; पण प्रायः महाराज पांढरीच कफनी घालीत व डोक्यास धोतर बांधीत. तसेच महाराजांना चिलीम, तंबाकू पुरवून त्यांच्या धुनीला सर्पणही पुरवावयाचे व जरूर पडल्यास पैसेही द्यावयाचे, हे व्रत काशीरामांनी चालविले. पुढे पुढे तर आपली पैशांची थैलीच महाराजांपुढे ठेवावयाची व महाराजांनी इच्छेस येईल तितके पैसे घ्यावे अशी विनंती करावयाची. महाराज त्या वेळेस दक्षिणा घेत नसत, तरीपण काशीरामाकडून पैसा दोन पैसे नेहमी घेत. महाराजांनी आपल्याकडून दक्षिणा घ्यावी याबद्दल काशिरामाला इतकी आतुरता असे की, एखादे दिवशी जर महाराजांनी दक्षिणा घेतली नाही, तर अतिशय वाईट वाटून डोळ्यांतून अश्रूही यावयाचे. अशा प्रकारे वाईट वाटणेसुद्‌धा परमार्थाला विघातक आहे. कारण त्यात माझी देण्याची शक्ती आहे अशातऱ्हेचा अभिमान शिरतो. अर्थात भक्तांच्या परमार्थाला विघातक गोष्टी असतील त्या काढून टाकण्याचा देवाचा नित्यसंकल्प असतो. त्याप्रमाणे काशीरामासही झाले. काही दिवसांनी त्याची पैशासंबंधाचे ओढाताण होऊ लागली, आणि महाराजांनी त्याच्याजवळ दक्षिणा मागण्याचा सपाटा चालविला. पैसे संपले असे त्याला मोठ्या कष्टाने म्हणावे लागले. मग 'वाण्याजवळ मागून मला आणून दे' असे महाराजांनी म्हटले. त्याप्रमाणे कांही दिवस वाण्याकडून मागून आणण्याचा क्रम चालू ठेवला. पुढे वाणीही पैसे देईनासा झाला. अर्थात सगळी लीला काशीरामाचा अभिमान दूर करण्यासाठीच होती. त्याची

अशी खात्री झाली की, आपली देण्याची शक्ती नाही, व हे त्याला पटल्याबरोबर त्याची सांपत्तिक स्थिती सुधारत चालली आणि तो पूर्वीप्रमाणे सुखवस्तू झाला. महाराजांनी आपल्याकडून दक्षिणा नित्य घ्यावी ही तळमळ पार नाहिंशी झाली.

काशीराम कापड विकण्याचा धंदा करीत असे व निरनिराळ्या गावी बाजारच्या दिवशी दुकान घाली. एकदा नाऊरच्या बाजाराहून परत येताना काही लुटारू भिल्लांशी त्याची गाठ पडली. काशीराम घोड्यावर होता. तिकडे लुटारू प्रथम गेले नाहीत पण त्याच्या बरोबर गाड्या रस्त्याने चालल्या होत्या त्या त्यांनी अडविल्या. नंतर काशीरामाकडे त्यांचे लक्ष गेल्याबरोबर ते तिकडे धावून गेले. चोरांनी काशीरामाला लुटण्याची तयारी केली व त्याप्रमाणे कांही सामान घेतलेही. त्याला काशीरामाने हरकत घेतली नाही. पुढे त्या चोरांनी त्याच्याजवळ एक लहानशी गाठोडी होती तिला हात घातला. चोरांना वाटले, त्यातच काही डबोले आहे. खरोखरच त्यात नुसती पिठीसाखर होती. काशीरामाला जानकीदासबाबा या नावाच्या सत्पुरुषाने मुंग्यांना साखर घालीत जावी असा उपदेश केल्यापासून काशीराम नेहमी साखर जवळ बाळगीत असे; अर्थात ती गठडी त्याला अत्यंत प्रिय होती, व काय वाटेल ते होवो पण ती गठडी जाऊ द्यावयाची नाही, असा त्याने निश्चय केला. तितक्यात त्या चोरांपैकी एकाची तलवार पडली होती, तिकडे काशीरामाचे लक्ष जाऊन त्याने ती उचलली व त्या चोरांपैकी दोघांना त्याने ठार केले. इतक्यात तिसऱ्या चोराने मागाहून येऊन कुऱ्हाडीचा घाव त्याच्या डोक्यावर घातला. त्याबरोबर काशीराम बेशुद्ध होऊन प्रेतवत पडला. राहिलेल्या चोरांना काशीरामाचा प्राणान्त झाला असे वाटून ते त्याला तेथेच टाकून चालते झाले. पण वस्तुतः त्याचा प्राणान्त झाला नव्हता. पुढे काही वेळाने तो शुद्धीवर आला व काही दिवसांनी बरा झाला. त्याची महाराजांवर पूर्ण श्रद्धा असल्यामुळे त्याने इस्पितळात जाण्याचे नाकारले व मला शिर्डीस घेऊन चला असा आग्रह धरला. त्याप्रमाणे त्याला तेथे

आणले आणि महाराजांच्या सांगण्यावरून तेथेच माधवराव देशपांड्यांकडून औषधोपचार करविला. अर्थात महाराजांच्या कृपेने काशीरामाची प्रकृती चांगली झाली.

या शूर कृत्याबद्दल मुंबई सरकारकडून काशीरामास एक तलवार बक्षीस मिळाली. काशीरामाची चोरांशी झटापट चालली असताना इकडे शिर्डीस महाराजांनी आकान्त करून सोडला. एकसारख्या शिव्या, बोंबा मारणे व इतर क्षोभाचे प्रकार चालले. जवळ असलेल्या मंडळींनी ताबडतोब ओळखले की कोणत्या तरी प्रिय भक्तावर अतिमहत्संकट आले आहे; व हा सगळा आकान्त त्या संकटातून भक्ताचे रक्षण करण्यासाठीच आहे आणि तसाच प्रकार झाला. चोर पुष्कळ असून हत्यारबंद होते. त्यांच्या तडाख्यातून काशीरामाने जिवंत सुटणे कोणालाही शक्य नव्हते; पण तारणाऱ्यापुढे मारणाऱ्याचे काय चालते ? असो. काशीराम यानंतर काही वर्षे वाचला व शके १८३० च्या चैत्र शुद्ध ११ ला वारला.

वर लिहिलेल्या तिघांपैकी म्हाळसापती बरेच दिवस हयात होते, आणि ते भाद्रपद शके १८४४ त वारले. त्यांचा व महाराजांचा अति निकट संबंध होता. महाराजांचे बसणे मशिदीत असे व निजणे एक रात्र मशिदीत व एक रात्र चावडीत असे. महाराज मशिदीत निजत त्या रात्री म्हाळसापती उजाडेपर्यंत महाराजांजवळ बसून असत, व मधूनमधून दोघांच्या अतिप्रेमाच्या गोष्टी चालत. म्हाळसापतींचे देहावसान होईपर्यंत त्यांचा एक दिवसआड मशिदीत रात्रभर बसण्याचा क्रम चालू असे. हे चांगले अधिकारी असून पूर्ण निरपेक्ष असत व यांच्यापासून महाराजांच्या भक्तांना बोध व आनंद नित्य मिळत असे; किंबहुना महाराजांच्या पश्चात त्यांच्या भक्तांना हे एक विश्रांतीस्थानच होते.

महाराज येथे आल्यापासून प्रायः येथील मशिदीत वास करू लागले. ती मशीद त्या वेळेला अगदी पडक्या स्थितीत असे.

महाराज दिवसा इकडे तिकडे जात, पण रात्री मशिदीतच राहात. कोणी जेवावयास नेले तर जात; लोकांस औषधपाणी सांगत व देत. त्यासाठी कधीही पैसा घेत नसत. इतकेच नव्हे, तर रोग्यांची शुश्रूषा योग्य होत नसली तर स्वतः आपण जाऊन करीत व अशा तऱ्हेने महाराजांनी ज्यांना औषधोपचार केला व ज्यांची शुश्रूषा केली अशी पुष्कळ मंडळी अजून येथे आहेत. पुढे औषधपाणी देण्याचे महाराजांनी बंद केले व नुसती उदी म्हणजे अंगारा देऊ लागले. पूर्वीही अंगारा देत असत व त्यापासून लोकांना गुण येई.

आपण पूर्वी लोकांना औषधपाणी करीत होतो, अशाविषयी उल्लेख महाराजांनीं एकदा प्रस्तुत लेखकाजवळ केला होता. ते म्हणाले, ''काका, (प्रस्तुत लेखकाला ते काका म्हणून हांक मारीत.) मी पूर्वी लोकांना औषध देत असे. पुढे औषध देणे सोडले आणि 'हरी हरी' करूं लागलो आणि हरी हरी करता करता हरी भेटला.''

महाराज येथे प्रथम आले तेव्हा येथे एक देवीदास नावाचे साधू असत व त्यांच्याकडे निरनिराळे साधू निरनिराळ्या वेळी येत. तसेच रामेश्वर, पंढरपूर व इतर दक्षिणेकडील क्षेत्रांना पायवाटेने जाणाऱ्या यात्रेकरूंचा हा रस्ताच असल्यामुळे पुष्कळ सत्पुरुषांचे पाय येथे वेळोवेळी लागत. त्यांपैकी **जा**नकीदास नावाचे साधू येथे बरेच दिवस होते. ते उत्तम अधिकारी होते असे सांगतात. त्यांची व महाराजांची फार बैठक असे. तसेच सुप्रसिद्ध **गं**गागीरबाबाही येथे येत असत. महाराज येथे आल्यानंतर जेव्हा गंगागीर येथे प्रथम आले, तेव्हा महाराज दोन हातांत दोन मातीच्या घागरी विहिरीवरून भरून नेत होते. त्यांना पाहिल्याबरोबर गंगागीरबाबा जवळ असलेल्या गांवकरी मंडळींना म्हणाले, ''ही मूर्ती येथे कधी आली ? हे केवळ रत्न आहे. यांची योग्यता फारच मोठी होती. गावचे फार मोठे भाग्य की, हे रत्न तुम्हांला लाभले.'' नंतर गंगागीरबाबा महाराजांच्या दर्शनास गेले व

दोघांच्या मोठ्या प्रेमाच्या गोष्टी झाल्या. असेच उद्गार महाराजांसंबंधाने अक्कलकोटच्या **आ**नंदनाथमहाराजांनी काढले होते. हे आनंदनाथमहाराज अक्कलकोटच्या सुप्रसिद्ध स्वामींचे शिष्य होते. ते येवल्याजवळ सावरगाव येथे एकदा गेले असता शिर्डीचे **मा**धवराव बळवंत देशपांडे, **द**गडू भाऊ गायके, **नं**दराम शिवराम मारवाडी व **भा**गचंद मारवाडी, त्यांच्या दर्शनास गेले होते. दर्शन झाल्यावर ही मंडळी शिर्डीस यावयाला निघाली, तो आनंदनाथमहाराज एकाएकी धावत येऊन त्यांच्या गाडीत बसले व म्हणाले, मी तुमच्याबरोबर येतो. नेवरगावाच्या व येवल्याच्या मंडळींनी या महाराजांना अडविण्याचा प्रयत्न केला पण तो व्यर्थ गेला. आनंदनाथ महाराज तेथे आले तेव्हा त्यांनी महाराजासंबंधाने शब्द काढले ते असे, ''हा हिरा आहे. याची खरी किंमत तुम्हालां नाही. हा जरी उकिरड्यावर असला तरी प्रत्यक्ष हिरा आहे, हे ध्यानात ठेवा.'' या वेळी महाराज प्रसिद्धीस आले नव्हते व गावातले लोक त्यांना एक साधारण किंबहुना वेडा फकीर मानीत.

महाराजांची स्थिती या वेळेला ''फाटके तुटके नेसतो रे। मन मानेल तेथे बसतो रे। वेड्या वेड्यापरि दिसतो रे। परी ब्रह्मांड गिळुनी असतो रे।।'' अशी होती. महाराज कधी ओढ्यावर जाऊन बसत; कधी गावकुसाजवळ असलेल्या एका लिंबाखाली बसत, कधी कोणाच्या मळ्यात जाऊन बसत; अंगावरील कपडे फाटके असत, कधी कधी उग्ररूप धारण करीत. या व अशाच वर्तनामुळे साधारण जनसमाजाला ते वेडेच वाटत. पण लवकरच लोकांचा भ्रम दूर झाला व महाराजांची योग्यता शिर्डीच्या लोकांना कळून आली. तो प्रकार असा घडून आला :-

महाराजांना मशिदीत व देवळांतूनही पुष्कळ दिवे लावण्याची हौस असे. अर्थात 'हौस असे' हे व्यावहारिक दृष्टीचे बोलणे आहे. खरोखर पाहिले तर त्यांचे करणे कोणतीच हौस पुरविण्याकरिता नसे. (कारण, त्यांना हौस उरलीच नव्हती.) तर

त्यात काहीतरी अन्य हेतू म्हणजे लोकांचे हित करण्याचाच असावयाचा. असो. या दिव्यांसाठी महाराज तेली व वाणी यांच्या घरोघर जाऊन तेल मागून आणीत. काही दिवस त्यांनी महाराजांना तेल दिले. अर्थात ती व्यावहारिक माणसे किती दिवस तेल देणार ? त्यांनी एक दिवस महाराजांना तेल नाही म्हणून सांगितले. त्यामुळे महाराजांच्या नित्यक्रमात थोडाच फरक पडणार होता ! महाराजांनी पणत्यांमध्ये तेलाऐवजी पाणी घातले आणि नेहमीप्रमाणे काकडे घालून काडी ओढून ते पेटविले. महाराज ही तयारी करीत असताना लोकांना त्यांच्या वेडेपणाविषयी खात्री वाटू लागली; पण जेव्हा काडी ओढून काकड्यांस लावल्याबरोबर ते पेटले व रात्रभर जळत राहिले, तेव्हा अर्थातच लोक थक्क झाले. ते महाराजांना शरण गेले व महाराजांची अवहेलना केल्याबद्दल क्षमा मागू लागले; कित्येकांनी तर महाराजांना निरनिराळ्या तऱ्हेने थोडे थोडे छळले होते. ते तर फारच घाबरले. पण महाराज पूर्ण दयाळू, उपकार करणाऱ्यांची सुद्धा उपेक्षा करावयाची नाही तर त्यांच्यावरही उपकारच करावयाचे हे महाराजांचे ब्रीद ! तेव्हा अर्थातच कोणालाही भिण्याचे कारण नव्हते. सर्व लोकांवर महाराजांचे प्रेम असून त्यांचे पुत्रवत प्रतिपालन महाराज करीत. गावावर कोणतेही संकट यावयाचे असले की महाराजांनी त्याची आगाऊ सूचना द्यावयाची व महाराजांचे सांगण्याप्रमाणे जे वागत ते निर्भय होत.

सगळ्या गावची जरी महाराजांवर श्रद्धा बसली, तरी महाराजांशी निकट संबंध फारच थोड्या लोकांचा असे, महाराजांच्या प्रखर वृत्तीमुळे त्यांच्याशी फाजील सलगी करण्याची कोणाची हिंमत होत नसे; आणि मशिदीत लोकांचे जाणे-येणे फार कमी असे. या वेळेला येथील देशपांडे घराण्यापैकी **माधवराव** बळवंत यांचे जाणे-येणे विशेष होऊ लागले. मशिदीच्या आवाराला लागूनच एक लहानसे घर होते, तेथे त्या वेळी मराठी शाळा असे. त्या शाळेत माधवराव हे मास्तर होते व त्यांनी

वेळोवेळी शाळेतून मशिदीत जाण्याचा पाठ पाडला. तेथे गेले म्हणजे चिलीम भरून आपण ओढावयाची आणि महाराजांना ओढावयाला द्यावयाची. कोणत्या कारणाने का होईना माधवरावांची महाराजांशी सलगी होऊ लागली आणि माधवरावांचे मन महाराज आकर्षण करू लागले. काही वर्षांनी माधवरावांनी सर्व धंदे सोडून केवळ महाराजांची व त्यांच्या दर्शनास येणाऱ्या मंडळींची सेवा हाच एक धंदा पत्करला. या सेवेबद्दल मोबदला म्हणून माधवरावांनी कधीही मागितला नाही. अजूनही यांचा आणि महाराजांच्या भक्तांचा निकट संबंध आहे आणि त्यांचा पुष्कळ मंडळीना आधार वाटतो; व कित्येक भक्त तर अधिक उणे कांही निघाल्यास माधवरावांच्या सल्ल्याशिवाय पुढे पाऊल टाकीत नाहीत.

महाराज शिर्डी सोडून बहुतकरून कोठे जात नसत. मात्र कधी कधी निमगावास **बाबासाहेब** डेंगळे या नावाचे महाराजांचे भक्त असत तिकडे जात व कधी राहत्यास **चंद्रभानशेट** मारवाडी यांचेकडे जात. चंद्रभानशेट वारल्यावर त्यांच्या दुकानाचा कारभार **खुशालचंदशेट** पाहत असत. या खुशालचंदजींना महाराज वारंवार बोलावणे धाडीत व कोणी राहत्याचा माणूस आला की त्याला खुशालचंद भेटला होता का म्हणून विचारीत. असो.

**बाबासाहेब** डेंगळे यांचे बंधू **नानासाहेब** डेंगळे जाळी-निमगाव येथे राहत असत. त्यांना मुलगा नव्हता. प्रथम कुटुंबास मुलगा होईना म्हणून दुसरे लग्न केले; तरीसुद्धा काही उपयोग झाला नाही. मग बाबासाहेबांनी त्यांना महाराजांच्या दर्शनास पाठविले. महाराजांच्या दर्शनास नानासाहेब डेंगळे आले तेव्हा महाराजांनी मुलगा होईल असा आशीर्वाद दिला व योग्य वेळी तो आशीर्वाद फलद्रूप होऊन त्यांना मुलगा झाला. अर्थातच त्यामुळे नानासाहेबांची श्रद्धा महाराजांवर बसली व ते महाराजांकडे वारंवार येऊ लागले. त्यांचे सरकारी कामगारांशी बरेच दळणवळण असल्यामुळे त्यांनी साहजिकच महाराजांचे गुण कामगर

मंडळींजवळ गायले आणि त्यामुळे लवकरच कलेक्टराचे चिटणीस रा. **चिदंबर** केशव ऊर्फ अण्णासाहेब गाडगीळ काही मंडळींना घेऊन महाराजांच्या दर्शनास आले. अण्णासाहेब गाडगीळांची महाराजांवरील श्रद्धा उत्तरोत्तर वाढत जाऊन ते महाराजांचे पूर्ण भक्त बनले.

महाराज ज्या मशिदीत बसत व निजत, ती पूर्ण मोडकळीस आलेली असून खाली धुरळा अतिशय, व वरूनही माती पडावयाची अशी स्थिती असल्यामुळे नानासाहेब डेंगळ्यांनी महाराजांना एक जाड फळी निजण्यासाठी आणून दिली. त्यांचा हेतू हा की, महाराजांनी नुसत्या जमिनीवर न निजता ती फळी खाली टाकून तिच्यावर निजावे. महाराजांनी त्या फळीचा उपयोग निजण्यासाठी केला, पण प्रकार निराळा केला. ती फळी जमिनीवर न टाकता, ती मशिदीच्या आढ्याला जुन्या चिंध्या बांधून टांगली व तिच्यावरू निजू लागले. त्या चिंध्यांकडे पाहिले तर फळीचे सुद्धा ओझे सहन करण्यासारख्या त्या नव्हत्या, पण महाराजांच्या प्रभावामुळे त्या फळीचेच काय, पण महाराजांच्या शरीराचेही ओझे त्या सहन करू लागल्या. निजताना चार बाजूंना चार जळत्या पणत्या महाराज ठेवीत. त्या फळीवर महाराजांना पाहण्याचे ज्याला त्याला मोठे कौतुक वाटे व पुष्कळ मंडळी लांब उभे राहून ते कौतुक पाहत; मात्र महाराजांना फळीवर चढताना किंवा उतरताना कोणी पाहिले नाही. पुष्कळदा मंडळीनी पाळती ठेवल्या पण महाराजांचें चढणे-उतरणे कोणालाही दिसले नाही. वरील कौतुक पाहण्यासाठी मंडळी फार जमू लागली, तेव्हा ही उपाधी दूर होण्यासाठी महाराजांनी ती फळी एके दिवशी तोडून टाकली.

**नानासाहेब** डेंगळे ज्या कारणासाठी महाराजांच्या दर्शनास प्रथम आले, त्याच कारणासाठी कोपरगावचे मुलकी सर्कल इन्स्पेक्टर **गोपाळराव** गुंड हेही दर्शनास आले. यांना तीन कुटुंबे असून मुलगा नव्हता. यांनाही महाराजांच्या आशीर्वादाने मुलगा

झाला. हेही महाराजांचे पूर्ण भक्त बनले. त्यांच्या मनात एकदा असे आले की, मशीद मोडकळीस आली आहे, ती आपण फिरून बांधवावी; व त्यासाठी त्यांनी बरेचसे दगड गोळा केले. पण महाराजांनी त्यांना मशीद बांधण्याची परवानगी दिली नाही. ते काम दुसऱ्या एका भक्ताकडून करवून घ्यावयाचे होते. ती हकीकत पुढे दिली आहे. गोपाळरावांनी जमविलेल्या दगडांचा विनियोग महाराजांच्या आज्ञेने तेथील शनीचे देऊळ बांधण्यात व गावातील दुसऱ्या देवळांचा जीर्णोद्धार करविला व ते देऊन मोठेही करविले. जसे गावातील देवळांकडे महाराजांचे लक्ष असे, तसेच येथील तुरबतीकडे सुद्धा महाराजांचे लक्ष असे. गावकुसाजवळील निंबाच्या झाडाखाली महाराज कधीकधी बसत म्हणून वर सांगितले आहे. तेथेच एक पीराची तुरबत आहे असे महाराजांनी एकदा म्हटले व तेथे खणून पाहिले तो तेथे खरोखरच तुरबत निघाली. मग त्या दिवशी मंडळींनी महाराजांची वाजत गाजत मिरवणूक काढली. या तुरबतीबद्दलचा उल्लेख महाराजांनी प्रस्तुत लेखकाजवळही केला होता. महाराज म्हणाले, ही आपल्या वडिलांची जागा आहे. येथे दर गुरुवारी व शुक्रवारी ऊद जाळीत जावा म्हणजे त्यात आपलेच कल्याण आहे. एकदा गोपाळराव गुंडांच्या मनात असे आले की, येथे महाराजांप्रीत्यर्थ वार्षिक जत्रा ऊर्फ उरूस भरवावा. तो विचार त्यांनी गावातील **तात्या** पाटील, **दादा** कोते पाटील, **माधवराव** देशपांडे वगैरे मंडळींपुढे ठेवला व त्यांना तो रुचून त्यांनी त्यासाठी जमवाजमव करण्याचे मनावर घेतले. पण तेथे तेव्हा असेल्या कुळकर्ण्याकडून आडकाठी झाली व तिचा परिणाम हा झाला की, कलेक्टराने जत्रा भरवू नये म्हणून हुकूम दिला. पण जत्रा भरविण्याचा हुकूम आणला. ती जत्रा महाराजांच्या आज्ञेने रामनवमीला भरवावयाचे ठरले, व तेव्हापासून ती सुरू झाली. ती अजूनही दर रामनवमीला भरत असते.

या जत्रेची व्यवस्था पहिल्यापासून शिर्डी येथील **तात्या** गणपती पाटील कोते हे पाहत असतात. त्यांच्यावर महाराजांचे अत्यंत प्रेम असे. हे महाराजांना 'मामा' म्हणत. यांची आई सौ. **बायजाबाई** यांनी महाराजांची फार सेवा केली आणि ती अशा

वेळेला की, जेव्हा गावातील बहुजनसमाज महाराजांना वेड्यात काढी. महाराज पूर्वी दिवसातून चारपाच वेळा गावात भिक्षेला जात. पण सौ. बायजाबाईंनी त्यांना कधीही विन्मुख लाविले नाही. अर्थात या सेवेचे फळ बाईंना तर मिळालेच, पण त्यांच्या सर्व कुटुंबाला व विशेषतः तात्यांना मिळाले. तात्यांना महाराज पैसे देत इतकेच नव्हे, तर त्यांचे सर्व तऱ्हेने लाड करीत. संध्याकाळी रोज तात्या हे महाराजांकडे जात व त्या वेळचा मामा-भाच्यांचा प्रेमाचा सोहळा पाहण्यासारखा व प्रेमाची भाषणे ऐकण्यासारखी असत. तसेच मशिदींतील व चावडींतील सर्व व्यवस्था तात्यांकडेच असे. तात्यांनी येऊन उठविल्याशिवाय महाराज उठत नसत; व तात्यांनी महाराजांना हाती धरून नेऊन तेथे महाराजांसाठी आसन घालावयाचे व त्यावर महाराजांनी बसावयाचे असा क्रम असे. चिलीमही तात्यांनीच भरून द्यावयाची.

रामनवमीच्या जत्रेच्या वेळी म्हणजे खुद्द रामनवमीचेच दिवशी दोन मोठ्या निशाणांची थाटाची मिरवणूक निघून मशिदीत जात असे; व तेथे ती दोन निशाणे दोन टोकांना बांधली जात. त्यापैकी एक निशाण रा. **शंकरराव** रघुनाथ देशपांडे ऊर्फ **नानासाहेब** निमोणकर यांजकडून येत असे, व दुसरे नगरचे **दामूशेट** कासार यांचेकडून येत असे. नानासाहेब निमोणकर हे निमोणचे देशपांडे होते. निमोण गांव संगमनेर तालुक्यात आहे. नानासाहेब तालुक्यात पुढारी गृहस्थांमध्ये मोडत असून सरकारने त्यांना ऑनररी मॅजिस्ट्रेट नेमले होते व ते काम त्यांनी पुष्कळ वर्षे केले. शेवटी वृद्धापकाळ झाला म्हणून ते त्यांनी सोडले. त्यांचे चुलते येथे राहत असत व ते कधी कधी येथे येत. येथे आले म्हणजे चुलत्यांच्या सांगण्यावरून महाराजांच्या दर्शनास जात. हळू हळू महाराजांवर त्यांची श्रद्धा वाढत चालली आणि शेवटची तीन वर्षे तर त्यांनी महाराजांच्या अखंड सेवेतच घातली. फक्त स्नानसंध्यादी नित्य कर्म उरकण्यापुरते घरी जात. बाकी सारा वेळ महाराजांच्या सेवेत तत्पर असत. साठी उलटून गेली होती, तरी महाराजांची सेवा करताना आळस किंवा विश्रांतीची इच्छाही कधी त्यांना शिवली नाही. महाराज त्यांना 'काका' म्हणून हाक

मारीत. महाराजांच्या पश्चात हे फार दिवस राहिले नाहीत. लवकरच त्यांना महाराजांनी आपल्या पायापाशी नेले. महाराजांच्या कृपेने त्यांना अंत उत्तम झाला. शेवटचे तीन दिवस त्यांना जिकडे तिकडे महाराज दिसत, व जो जवळ येई त्याला साईबाबा (महाराजांना 'बाबा' म्हणत ते वर सांगितलेच आहे) म्हणत. स्वतःच्या कुटुंबालाही ''या साईबाबा'' असे म्हणत. कुटुंबाला वाटले, त्यांना काही भ्रम झाला असेल आणि म्हणून कुटुंबाने म्हटले, ''मी बाबा नव्हे, मी आपली पत्नी आहे,'' त्यावर ते म्हणाले, ''तुझ्यात कोण, बाबाच आहेत. तू बाबाच आहे.'' अशा तऱ्हेने महाराजांच्या अखंड स्मरणात त्यांचा अंत झाला.

रामनवमीच्या वेळी दुसरे निशाण येते ते **दामोदर** सावळाराम ऊर्फ दामूशेट कासारांचे हे वर सांगितलेच आहे. यांना दोन कुटुंबे असून एकापासूनही पुत्रसंतती नव्हती व त्यामुळे ते फार खंत करीत असत. त्यांना एकदा माधवराव देशपांड्यांचे सासरे रा. **गोविंदराव** सापकर यांनी येथे येऊन महाराजांचा आशीर्वाद घ्यावा असे सुचविले. त्याप्रमाणे ते आले. महाराजांनी आशीर्वाद दिला व त्या आशीर्वादाप्रमाणे त्यांना मुलगा झाला. अर्थात त्यांची निष्ठा महाराजांवर बसली; व तेव्हापासून रामनवमीला नवीन निशाण आणावयाचे व त्या दिवशी येथे फकीर जमले असतील त्या सगळ्यांना जेवू घालावयाचे हा नेम त्यांनी धरला; व तो त्यांचा नेम अजून चालू आहे.

रामनवमीची जत्रा सुरू होण्यापूर्वी काही वर्षे महाराजांनी एका निष्काम भक्ताला आपल्याकडे ओढून घेतले होते. ते भक्त म्हणजे रा. **नारायण गोविंद** ऊर्फ **नानासाहेब** चांदोरकर. हे कल्याणचे राहणारे असून त्या वेळेला नगरच्या कलेक्टरचे चिटणीस होते. यांना एके दिवशी येथील कुळकर्णी रा. **केशव** अनंत ऊर्फ **आप्पा** यांनी सांगितले की, आपल्याला महाराजांनी बोलाविले आहे. नानासाहेबांना हे आप्पांचे बोलणे प्रथम खरे वाटले नाही, व त्यांना त्यांनी म्हटले; उगीच महाराजांचे नाव कशाला

सांगतोस ? तुझे माझ्याशी काही काम असेल तर तसे स्पष्ट सांग. त्यावर आप्पाने खरोखर महाराजांनी बोलावले आहे असे निश्चयाने सांगितल्यावरून नानासाहेब महाराजांच्या दर्शनास आले व लवकरच त्यांची श्रद्धा महाराजांवर बसली. मग ते तेथे वारंवार येऊन महाराजांच्या बोधामृताचा लाभ घेऊ लागले. महाराजांच्या व त्यांच्या तासच्या तास बैठकी होत. ''तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया। उपदेक्ष्यंति तेऽज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ।।'' या श्रीभगवदुक्तीप्रमाणे नानासाहेबांचे प्रणिपात, परिप्रश्न व सेवा असत आणि महाराज त्यांना उपदेश करीत. एकदा तर याच श्लोकाचे विवेचन महाराज सुमारे एक तास करीत होते. त्या विवेचनावरून नानासाहेबांची खात्री झाली की, महाराजांना संस्कृत उत्तम येत असले पाहिजे. नानासाहेबांनी महाराजांची सेवा अतिउत्तम केली. त्यात विशेषतः दोन गोष्टींमुळे तर ते महाराजांच्या भक्तांना चिरस्मरणीय राहतील. एक तर महाराजांची जुनी मशीद होती ती त्यांनी मोडून फिरून बांधली व मोठी केली. नानासाहेबांना हे काम स्वतः करून घेण्याला सवड नव्हती, म्हणून त्यांचे विनंतीवरून नानासाहेब निमोणकरांनी येथे राहून स्वतः देखरेख करण्याचे पत्करले व ते काम त्यांनी उत्तम तऱ्हेने पार पाडले. मशीद बांधण्याला महाराजांची परवानगी म्हाळसापतींच्या द्वारे मागितली व ती महाराजांना दिली. तरीपण काम चालू असताना महाराजांनी वेळोवेळी काम पाडून टाकावे आणि मोठमोठे जड दगड व प्रयाली आपल्या हातांनी दूर भिरकावून द्याव्यात, मग ते का पुन्हा करण्यात यावे. हे महाराजांचे कृत्य इतरांना चमत्कारिक वाटेल, पण त्यातील खरे इंगित ज्यांना ठाऊक आहे, त्यांना महाराजांच्या कृतीचे नवल वाटणार नाही. शेवटी एकदाचे मशिदीचे काम पुरे झाले; व त्या दिवशी महाराज निमगावास गेले असता त्यांना तेथून वाजत गाजत आणून नव्या मशिदीत बसविले. या मशिदीचे काम करण्यात येथील सुतार **कोंडाजी, गबाजी व तुकाराम** हे तिघे बंधू फारच उपयोगी पडले. महाराजांच्या देहावसानापर्यंत मशीद झाडणे, महाराजांची भांडी घासणे, महाराजांचे तोंड धुवावयाचे पाणी तापविणे व ते पाणी सारणे ही सर्व कामे तुकारामच करीत असे. महाराज सहसा दुसऱ्या

कोणाला हे काम करू देत नसत. अजूनही रामनवमीच्या निशाणाची मिरवणूक या सुताराच्या घरी तयार होऊन तेथूनच निघते.

नानासाहेबांची दुसरी मोठी कामगिरी म्हणजे महाराजांच्या कीर्तीचा प्रसार करून लोकांना महाराजांच्या आशीर्वादाचा लाभ करून देणे ही होय. हे पूर्वी मामलेदार व नंतर डेप्युटी कलेक्टर असल्यामुळे यांना पुष्कळ फिरावे लागे व त्या फिरण्यामध्ये ते जेथे जेथे जात, तेथे तेथे महाराजांचे गुणवर्णन करीत, व महाराजांच्या दर्शनाविषयी लालसा उत्पन्न करीत. प्रस्तुत लेखकाला महाराजांच्या दर्शनाचा लाभ घडावयाला कारण नानासाहेबच होत. मुंबई व ठाणे जिल्ह्यांतील हजारो लोक महाराजांचे दर्शन घेऊन आनंद व लाभ पावले, याला कारणही नानासाहेबच. मुंबईच्या मंडळींचे मन ओढण्याला नानासाहेबांशिवाय आणखी दोन व्यक्ती विशेष कारणीभूत झाल्या. त्यापैकी एक रा. **गणेश** दत्तात्रेय सहस्त्रबुद्धे ऊर्फ **दासगणू** हे होत. हे पूर्वी पोलिस खात्यात असत. यांना तमाशाचा फार नाद असे. नानासाहेबांच्यामुळे हे महाराजांचे दर्शनास आले, व हळू हळू त्यांच्या मनावर महाराजांनी इतका परिणाम केला की, त्यांनी नोकरी सोडून संतचरित्रांचा कीर्तनरूपाने व ग्रंथरूपाने लोकांत प्रसार करण्याचा उपक्रम सुरू केला. हा यांचा क्रम अजून चालू आहे. यांनी अर्वाचीन **भक्तलीलामृत, संतकथामृत, भक्तिसारामृत** हे संतचरित्रात्मक ग्रंथ लिहिले असून त्याशिवाय ईशावास्योपनिषद आणि श्रीज्ञानेश्वर महाराजांचा अमृतानुभव या दोन ग्रंथावर मराठीत सरस आणि सुबोध टीका केल्या आहेत. याशिवाय यांचे आणखीही ग्रंथ आहेत. नानासाहेब चांदोरकरांनीं यांना मुंबईस नेऊन त्यांच्या भक्तिरसपरिप्लुत कीर्तनांचा व तद्द्वारा महाराजांच्या गुणश्रवणाचा लाभ मुंबईकरांस करून दिला. यांच्या कीर्तनामुळे मुंबईची व मुंबईच्या आसपासची पुष्कळ मंडळी महाराजांचे दर्शन घेण्यास आतुर झाली व दर्शनास गेली. वर उल्लेख केलेली दुसरी व्यक्ती म्हणजे प्रस्तुत लेखक. याचेही या सुमारास महाराजांच्या चरणांजवळ पुष्कळ राहणे होऊ लागल्यामुळे मुंबईच्या सार्वजनिक चळवळीतून त्याचे अंग साहजिक निघाले व तो बाबा (म्हणजे बैरागी, संन्यासी वगैरे) झाल्याचे पार्शी व

इतर पत्रांतून छापून आल्यामुळे, ज्यांच्यामुळे हे स्थित्यंतर झाले त्यांचे दर्शन घेण्यासाठी काही मंडळी आली. एकंदरीत १९१० पासून महाराजांच्या दर्शनास येणाऱ्यांची संख्या बरीच वाढत गेली.

नानासाहेब चांदोरकर येथे आले त्या वेळी येथे दर्शनास येणाऱ्या मंडळींना राहण्यासाठी एकही वाडा नव्हता. पण ही उणीव महाराजांनी लवकरच भरून काढली. या जिल्ह्यात रावबहादूर हरी विनायक साठे डेप्युटी कलेक्टर होते. त्यांचे प्रथम कुटुंब निवर्तल्याला पुष्कळ दिवस झाले होते. पण फिरून लग्न करण्याची आज्ञा दिली व मुलगा होईल असा आशीर्वाद दिला. रावबहादूरांनी मुलगी पसंत करून ती महाराजांना दाखवावी असे तिचे वडील रा. गणेश दामोदर केळकर यांना कळविले. त्याप्रमाणे ते मुलीला तेथे घेऊन आल्यावेळी महाराजांनी तिच्या ओटीत एक खरबुज टाकले व मुलीला कुंकू लावले. पुढे योग्य वेळी लग्न लागले आणि त्यानंतर लवकरच महाराजांच्या सुचविण्यावरून त्यांनी वर लिहिलेले लिंबाचे झाड त्यासभोवतालची जागा विकत घेऊन तेथे एक वाडा बांधला. त्यामुळे दर्शनास येणाऱ्या मंडळींची उतरण्याची सोय झाली. पुढे तीन वर्षांनी महाराजांनी प्रस्तुत लेखकाकडून एक वाडा बांधून घेतला, व त्यानंतर नागपूरचे श्रीमंत **गोपाळराव** ऊर्फ **बापूसाहेब** बुटी यांजकडून एक वाडा बांधून घेतला. हा वाडा फार मोठा व सर्वस्वी दगडाचा असून मजबूत आहे व याला खर्चही बराच लागला. शिर्डीच्या आसपास किंबहुना सबंध तालुक्यात अशी इमारत असेल असे वाटत नाही. याच वाड्यात महाराजांची समाधी आहे.

लवकरच शिर्डीला संस्थानचे रूप येऊ लागले. महाराजांची आरती होऊ लागली आणि आरतीच्या वेळेस चवऱ्या, छत्र-चामरे महाराजांवर ढळू लागली. चावडीत महाराज जाताना वाजतगाजत घोडा, पालखी, चोपदार, भजनकरी मंडळी, टके-पताका या इतमामानिशी जाऊ लागले. चावडी आरसे, हंड्या, झुंबरे, तसबिरी यांनी सुशोभित झाली. मशिदीला व चावडीला फरशी झाली; वगैरे वगैरे, या सर्व शोभेचे श्रेय बहुतांशी कै. **सुंदराबाई** क्षीरसागर ऊर्फ **राधाकृष्णाआई** यांना आहे. या

प्रेमळ भक्तीच्या आचार्या होत्या, असे म्हणण्याला यत्किंचितही हरकत नाही. यांच्याजवळ धन तर नव्हतेच, पण आपले तन व मन सर्वस्वी महाराजांना अर्पण करून, महाराजांच्या निरनिराळ्या भक्तांकडून जिनसा आणवून त्यांनी शिर्डी संस्थान उत्तम थाटून दिले. दुर्दैवाने त्यांचा अवतार लवकरच म्हणजे त्यांच्या वयाच्या ३५ व्या वर्षी संपला ! त्या येथे आठ नऊ वर्षेच होत्या. पण तेवढ्या मुदतीत त्यांनी जे जे केले ते दुसऱ्याला पंचवीस वर्षात करता आले असते की नाही, याची शंका वाटते. याबाईंमुळेच चावडीत रात्री महाराजांची शेजारती व पहाटेस काकड आरती सुरू झाली. महाराज पहिल्याने स्वतःची पूजासुद्धा करू देत नसत. पहिली पूजा म्हाळसापतीकडून घेतली. नंतर कांही दिवसांनी निंबगावचे **सीताराम** डेंगळे पूजा करावयास आले असता महाराज त्यांच्यावर संतापले, पण त्यांची पूजा शेवटास जाऊ दिली. नंतर काही दिवसांनी नानासाहेब चांदोरकरांचा धाकटा मुलगा **महादेव** ऊर्फ **बापू** याला समाधानाने पूजा करू दिली, व त्यानंतर सगळ्यांनाच पूजा करण्याची मुभा मिळाली. पण त्या वेळेला महाराज आपली आरती करू देत नसत. काही दिवसांनी प्रथम आरती करण्याचा मान रा. **लक्ष्मण** कृष्णाजी ऊर्फ **तात्यासाहेब** नूलकर यांना मिळाला. हे पंढरपूरचे मुन्सफ असून आजारी पडल्यामुळे रजा घेऊन येथे आले होते; पण मनात हेतू हाच की, आता नोकरी सोडून उरलेले आयुष्याचे दिवस महाराजांच्या चरणांजवळ घालवावयाचे; व त्याप्रमाणे शेवटी घडून आले.

**राधाकृष्णाआई** स्वतः सर्व तऱ्हेची सेवा करीत. इतकेच नव्हे, तर त्या महाराजांच्या बहुतेक भक्तभंडळींकडून महाराजांची सेवा करवून घेत. त्या निरनिराळी कामे करीत; आणि त्यात सगळ्यांना गोवीत; आणि सगळी मंडळी प्रेमाने व हौसेने काम करीत. त्यात सर्व दर्जाची मंडळी असत व स्त्रियाही असत. माती-दगड वाहणे, रस्ते झाडणे, चिखल करणे व वाहणे, खड्डे खोदणे व भरणे, झाडे लावणे, लाकडे फोडणे, हंड्या-झुंबरे पुसणे, मशीद धुणे व रंगवणे कागदाची फुले कातरणे, चवरी-मोरचेल-अबदागिरी-निशाणे धरणे, निशाणे शिवणे वगैरे सर्व तऱ्हेची कामे मोठमोठी मंडळी व मोठ्या घराण्यांतल्या

कुलस्त्रियासुद्धा करीत आणि आपल्याला सेवा करण्याला संधी मिळाली म्हणून आनंद मानीत.

महाराजांचा नित्यक्रम फार नियमाने पाळला जात असे. ते पहाटेस उठून धुनीपाशी बसत. नंतर काही वेळाने शौचविधी उरकून आपल्या हाताने फेडून टाकीत. नंतर काही वेळ स्वस्थ बसत. तेवढ्या अवकाशात **भागोजी** शिंदे या नावाच्या गृहस्थाने येऊन महाराजांच्या उजव्या हाताला पट्टे असत ते सोडावयाचे; हात चोळावयाचे व सर्व अंग दाबावयाचे; नंतर चिलीम भरून आपण पेटवून महाराजांना ओढावयाला द्यावयाची व महाराजांनी ओढून पुन्हा भागोजीस ओढावयाला द्यावयाची असे पाच-सहा वेळा झाल्यावर भागोजीने जावयाचे. या भागोजीला महाव्याधीने पछाडले होते. तरी, महाराजांनी कधीही त्याचा कंटाळा केला नाही किंवा त्याच्यासंबंधाचा आपला नित्यक्रम यत्किंचितही बदलला नाही. भागोजी गेल्यानंतर काही वेळ महाराज बसत असत व त्यावेळेला काही नियमित भक्तमंडळी येऊन सेवा करीत व नंतर महाराज तोंड धुण्यास उठत. महाराजांचे तोंड धुणे पाहण्यासारखे असे. हातावर, पायावर, तोंडावर, कानावर पाणी यथेच्छ घ्यावयाचे व हे सर्व भाग चांगले स्वच्छ करावयाचे; पण ते अत्यंत नाजूकपणाने करावयाचे.

**श्री एकनाथ** महाराजांनी वर्णन केल्याप्रमाणे **''रोम रगडतील संपूर्ण। यालागीं न करी अंगमर्दन। एवं स्वदेहाचें देहपण। भूतहिंसेभेणें अहंत्वा नाणी''** (ए.भा., अ. ३, ओवी ४५८). असाच प्रकार स्नानाच्या वेळेसही असे. तोंड धुणे झाल्यावर बाबा गावात भिक्षेला जात. भिक्षेसाठी नेमक्या पाच ठिकाणीं जाऊन एके ठिकाणी उभे राहत. भाकरी व कोरड्यास काय येईल ते घ्यावयाचे व मग मशिदीत आल्यावर थोडेसे खावयाचे. खाणे झाल्यावर काही वेळ बैठक व्हावयाची. त्यावेळी बरीच भक्तमंडळी जमत असत व महाराज गोष्टीरूपाने बोध करीत. कधी कधी याच बैठकीच्या वेळी केळी, पेरू, आंबे विकत घेऊन मंडळींना महाराज वाटीत व आपल्या हाताने खाऊही घालीत. आपल्या हाताने खाऊ घालीत म्हणजे, केळी आपल्या हाताने

